उमरेड, जिल्हा नागपूर येथे उमरेड, कुही व भिवापूर या तालुक्यांसाठी दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) स्थापन करण्यास व या न्यायालयासाठी पदनिर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत ......

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इएसटी २११४/प्र.क्र.९६/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २१ जून,२०१७

**वाचा -**

१ शासन निर्णय , विधि व न्याय विभाग क्रमांक पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक २७ जानेवारी, २०१५

२ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७

३ मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)A-१२१४ of २००९, दिनांक १०.१०.२०१४

**प्रस्तावना -**

राज्यातील विविध ठिकाणी न्यायालय सुरु करण्यासाठी प्रलंबित खटले / प्रकरणांची संख्या किमान ५०० असावी, त्याचबरोबर पायाभूत सुविधा, उदा. न्यायालयीन इमारती आणि न्यायाधिशांची निवासस्थाने यांची उपलब्धता असावी या मा.उच्च न्यायालयाच्या धोरणानुसार आवश्यक सर्व निकष उमरेड, जिल्हा नागपूर येथे दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर स्थापन करण्यासाठी पूर्ण होत असल्याचे सकृतदर्शनी दिसून येत असल्याने मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे स्तरावर गठीत The Establishment of Courts Committee या समितीने उमरेड, कुही व भिवापूर या तालुक्यांसाठी उमरेड, जिल्हा नागपूर येथे दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) स्थापन करण्यास मान्यता दिली आहे.

त्या अनुषंगाने उमरेड, जिल्हा नागपूर येथे उमरेड, कुही व भिवापूर या तालुक्यांसाठी दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर स्थापन करण्याची व त्याकरीता आवश्यक पद निर्मितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:

## शासन निर्णय-

उमरेड, जिल्हा नागपूर येथे उमरेड, कुही व भिवापूर या तालुक्यांकरीता दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर स्थापन करण्यासाठी व या न्यायालयासाठी १९ अस्थायी पदे न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. पहारेकरी व सफाईगार या पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यात यावी.

नागपूर जिल्ह्यातील उमरेड, कुही व भिवापूर या तालुक्यांसाठी उमरेड येथे स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर या न्यायालयासाठी पदनिर्मिती

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या | पदांची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर | १ | ३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१० |
| २ | अधिक्षक | १ | ९३००-३४८००-ग्रेड पे - ४६०० |
| ३ | सहायक अधिक्षक | २ | ९३००-३४८००-ग्रेड पे ४४०० |
| ४ | लघुलेखक निम्नश्रेणी | १ | ९३००-३४८००-ग्रेड पे ४३०० |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २ | ५२००-२०२००-ग्रेड पे २४०० |
| ६ | कनिष्ठ लिपिक | ८ | ५२००-२०२००-ग्रेड पे १९०० |
| ७ | बेलिफ | २ | ५२००-२०२००-ग्रेड पे १९०० |
| ८ | शिपाई | २ | ४४४०-७४४०-ग्रेड पे १३०० |
| ९ | पहारेकरी | - - | बाह्ययंत्रणेद्वारे |
| १० | सफाई कामगार | - - | बाह्ययंत्रणेद्वारे |
|  | एकूण | १९ |  |

२. उपरोक्त नमूद पदे भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

३. यासाठी होणारा खर्च सन २०१७-१८ साठी पुरवणी मागणीद्वारे निधिची तरतुद करुन व त्यानंतरच्या कालावधीसाठी संबंधित आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून "मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान (००)(१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत" या लेखाशीर्षाखालील उद्दीष्टांसाठी अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८६/व्यय-५, दिनांक ०७.०६.२०१७ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१०/आपुक, दिनांक ०७.०६.२०१७ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२११६०५३६५९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ecf8ac6cd2050be6b2f1a2e67257b46e511d059da5a2b598b641533ab0393dac, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2017.06.21 16:03:14 +05'30'

( नी. प्र. धोटे )

विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
५. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
७. सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
९. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१०.प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
११.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१२.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
१३.महालेखापाल १, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१४.महालेखापाल २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१८. उपजिल्हा कोषागार अधिकारी, उमरेड, जिल्हा नागपूर,
१९.वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.क., मंत्रालय, मुंबई,
२०. विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२१. निवडनस्ती (का.१२)